“शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह योजना” अंतर्गत लाभार्थ्यांना देण्यात येणाऱ्या अनुदानात वाढ करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांक- मवबा २०२४/प्र.क्र.५८/कार्या-२,

नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,

हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:-१४ मार्च, २०२४.

**संदर्भ:-** १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २००८/प्र.क्र.५५/का-२, दि.०७.०५.२००८.

२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०११/प्र.क्र.९३/का-२, दि.३०.०९.२०११.

३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१२/प्र.क्र.२२०/का-२, दि.१५.०२.२०१४.

४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.धोरण २०२०/प्र.क्र.१४९/का-२, दि.०७.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.०७.०५.२००८ अन्वये, महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या/शेतमजुरांच्या मुलींच्या सामुहिक किंवा नोंदणीकृत विवाहासाठी “शुभमंगल सामूहिक/नोंदणीकृत विवाह योजना” राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. या योजनेंतर्गत शेतकरी/शेतमजुर कुटुंबातील मुलीच्या विवाहासाठी आवश्यक असलेल्या मंगळसुत्र व इतर वस्तुंची खरेदी करण्यासाठी प्रती जोडपे रु.१०,०००/- एवढे अनुदान शासनातर्फे देण्यात येते. सदर अनुदान वधुच्या वडीलांच्या नावाने, वडील हयात नसल्यास आईच्या नावाने व आई-वडील दोन्हीही हयात नसल्यास वधुच्या नावाने धनादेशाद्वारे देण्यात येते. तसेच सामुहिक विवाह राबविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना प्रत्येक जोडप्यामागे रु.२,०००/- एवढे प्रोत्साहनात्मक अनुदान देण्यात येते.

उक्त नमूद शासन निर्णयातील तरतुदींमध्ये आवश्यकतेनुसार बदल करुन शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.३०.०९.२०११ अन्वये, सदर सुधारीत “शुभमंगल

सामुहिक/नोंदणीकृत विवाह योजना" संपुर्णपणे "जिल्हा नियोजन विकास समिती" (DPDC) मार्फत राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे.

शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.३०.०९.२०११ अन्वये कार्यान्वित "शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह योजनेची व्याप्ती वाढवून, ती केवळ शेतकरी/शेतमजुर यांच्यासाठी न ठेवता, अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती/विमुक्त जाती/ भटक्या जमाती/विशेष मागास प्रवर्ग वगळता अन्य प्रवर्गातील रुपये एक लक्ष पेक्षा कमी वार्षिक उत्पन्न असलेल्या निराधार/परित्यक्ता आणि विधवा महिलांच्या केवळ दोन मुलींच्या विवाहाकरीता शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.१५.०२.२०१४ अन्वये लागु करण्यात आली आहे.

"शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह" योजनेच्या अंमलबजावणीस जवळपास १० वर्षांचा कालावधी उलटून गेला असून, त्यानुसार महागाईच्या दरामध्ये वाढ झालेली आहे. तसेच, महाराष्ट्र राज्याचे "४ थे महिला धोरण-२०२४" दि.०७.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले असून, त्यामध्ये शुभमंगल सामुहिक विवाह योजनेंतर्गत प्रती जोडपे देण्यात येणाऱ्या रु.१०,०००/- या रक्कमेत उचित वाढ करण्याचा विचार केला जाईल, असे स्पष्ट केले आहे. त्यास अनुसरुन "शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह योजना" अंतर्गत लाभार्थ्यांना देण्यात येणाऱ्या अनुदानात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"**शुभमंगल सामुहिक/नोंदणीकृत विवाह"** योजनेंतर्गत मुलीच्या विवाहासाठी आवश्यक असलेल्या वस्तुंची खरेदी करण्यासाठी देण्यात येणाऱ्या प्रती जोडपे रु.१०,०००/- या अनुदानात वाढ करुन प्रती जोडपे रु.२५,०००/- इतके अनुदान देण्यास तसेच सामुहिक विवाह राबविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना प्रत्येक जोडप्यामागे देण्यात येणाऱ्या रु.२,०००/- या अनुदानात वाढ करुन, प्रती जोडपे रु.२,५००/- एवढे प्रोत्साहनात्मक अनुदान देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेच्या अटी व शर्ती तसेच कार्यपध्दती शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, दि.०७.०५.२००८, दि.३०.०९.२०११ व दि.१५.०२.२०१४ अन्वये विहीत केल्यानुसारच राहतील.

३. सदर योजनेतील लाभार्थीना शासनाच्या अन्य विभागांकडून राबविण्यात येणाऱ्या सामुहिक विवाह योजनेंतर्गत लाभ मंजुर करता येणार नाही.

४. सदर योजनेंतर्गत शासन निर्णय, दि.३०.०९.२०११ अन्वये, जिल्हा महिला व बाल अधिकारी कार्यालयामार्फत संबंधीत बँकेच्या शाखेमध्ये रक्कम जमा करावी व पात्र लाभार्थ्यांच्या बँक खात्यात बँकींग Electronic Transfer Facility ने किंवा इतर मार्गाने त्यांच्या खात्यात रक्कम जमा करण्यात यावी, अशी तरतूद आहे. आता, त्यात बदल करुन संबंधित जिल्हा महिला व बाल अधिकारी कार्यालयामार्फत अनुदानाची रक्कम **थेट लाभार्थी हस्तांतरण ( DBT )** पध्दतीने संबंधीत लाभार्थ्यांच्या खाती जमा करण्यात यावी, अशी तरतूद या शासन निर्णयाद्वारे करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णयातील तरतूदी दि.०१.०४.२०२४ पासून लागू होतील.

६. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या सहमती व दि.१३.०३.२०२४ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१४१९४२४८२०३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7aca67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2024.03.14 19:54:58 +05'30'

**(प्र.वि.कुलकर्णी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/सदस्य, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,

११.विभागीय आयुक्त (सर्व),

१२.आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,

१३.आयुक्त, एकात्मिक बाल सेवा योजना, नवी मुंबई,

१४.व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, वांद्रे, मुंबई,

१५.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१६.सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, वरळी, मुंबई,

१७.सचिव, बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई,

१८. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१९.जिल्हाधिकारी (सर्व),

२०. सर्व महानगरपालिका/जिल्हा परिषद/नगरपालिका/नगरपरिषद,

२१.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

२२.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,

२३.सह सचिव, उपसचिव, अवर सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

२४.सर्व विभागीय आयुक्त, महिला व बाल विकास,

२५.सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालय पुणे मार्फत),

२६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२७.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालय पुणे मार्फत),

२८. सर्व जिल्हा विवाह नोंदणी निबंधक,

२९.महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने),

३०.निवड नस्ती, कार्यासन-२